ई गव्हर्नन्स प्रकल्पा अंतर्गत N.I.C. च्या
खर्चास प्रशासकीय मान्याता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईगव्ह १५१७/ प्र.क्र.१२/१७/ संगणक**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २७ मार्च, २०१७

**प्रस्तावना -**

शालेय शिक्षण विभागासाठी ई गव्हर्नन्सतंर्गत विविध संगणक प्रणाली तयार करण्याची जबाबदारी NIC पुणे याचेकडे सोपविण्यात आली आहे. या कामासाठी NIC दिल्ली यांच्या National Informatics Centre Services Inc. (NICSI) या संस्थेमार्फत या संस्थेमार्फत उपलब्ध करुन घेतले जात आहे. तसेच शिक्षकांचे वैयक्तिक मान्यता, शिक्षक समायोजन इत्यादींची माहिती संगणक प्रणालीवर भरण्याचे काम सुरू आहे. प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक १९जानेवारी २०१७ च्या बैठकीमध्ये वरील माहिती संगणक प्रणालीमध्ये विकासीत करण्यासाठी व तसेच या संस्थेस प्रोग्रामर व इतर मनुष्यबळ उपलब्ध करून घेण्याबाबत मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय-**

शिक्षण आयुक्त, पुणे यांनी ई गव्हर्नन्स प्रकल्पातंर्गत NIC या संस्थेच्या संगणक प्रणालीसाठी येणाऱ्या खर्चाचे Proforma Invoice सादर केलेले आहे. त्याचा एकूण खर्च सन २०१७-१८ साठी खालीलप्रमाणे.

| अ.क्र. | कालावधी | एकुण रक्कम |
|---|---|---|
| १ | ०१.४.२०१७ ते ३०.९.२०१७ | ६५,८७,१०१.०० |
| २ | १.१०.२०१७.ते ३१.०३.२०१८ | ६८,६८,६६०,०० |
| | एकुण रक्कम | १,३४,५५,७६१.०० |

३. NIC या संस्थेने संगणक प्रणालीसाठी सादर केलेल्या देयकाप्रमाणे एकूण रु. १,३४,५५,७६१/- (रुपये एक कोटी चौतीस लाख पंच्चावन हजार सातशे एकसष्ट ) इतकी रक्कम रक्कम अदा करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर खर्च "मागणी क्र. ई-२, ३१ सहाय्यक अनुदाने २२०२ -सर्वसाधारण शिक्षण, ८०- पंचवार्षिक योजनातंर्गत योजना (००)-(५१) ई गव्हर्नन्स कार्यक्रम (२२०२ एच ४५४)" या लेखाशिर्षामधून सन २०१६-१७ साठी उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त शिक्षण, पुणे यांना नियंत्रक व शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), कार्यालयातील सहायक संचालक लेखा यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

NIC यांच्याकडून सादर करण्यात आलेल्या देयकांची तपासणी करून त्यांचे काम पूर्ण केल्याची खात्री करून मानधन अदा करण्यात यावे.

५. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दिनांक १७ एप्रिल २०१५ नुसार वित्त अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्रमांक चार, परिच्छेद क्र.२७ (२) (ब) अन्वये विभागस प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२७१५४७३६९८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila D Chaudhari

Digitally signed by Charushila D Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila D Chaudhari
Date: 2017.03.27 15:49:32 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन , मुंबई.
२. मा. मंत्री / राज्यमंत्री शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मुंबई.
३. मा. सचिव, शालेय शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. मा. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), शिक्षण संचालनालय, पुणे.
७. शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे.
८. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ / २ , मुंबई / नागपूर
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ / २ , मुंबई / नागपूर
११. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२. वित्त विभाग / अर्थसंकल्प शाखा
१३. निवड नस्ती (संगणक)